**ग्रामीण रुग्णालय मुरुड जि.लातूर येथील ५० खाटांच्या श्रेणीवर्धीत उपजिल्हा रुग्णालय इमारत बांधकामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०२३/ प्र.क्र.१२९/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.

दिनांक : १ ऑगस्ट, २०२३.

वाचा :- सहसंचालक, आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांकः आआसे/कक्ष-३/टे-६ /मुरुड५०खाटाबांधकाम/४६२०-२१/२३, दि.०८.०५.२०२३.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण रुग्णालय मुरुड जि.लातूर येथील ३० खाटांच्या रुग्णालयाचे ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयात श्रेणीवर्धन करण्यास शासन निर्णय दि.४.०७.२०२२ अन्वये "विशेष बाब" म्हणून मान्यता देण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने सदर श्रेणीवर्धीत ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालय इमारत बांधकामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यतेसाठी प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाकडे सादर केला असता सदर श्रेणीवर्धीत ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालय इमारत बांधकामाचे कामाचे अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाने छाननीअंती Recapulation sheet नुसार रु. २५४७.३७ लक्ष इतकी परिगणित करुन सदर प्रस्ताव मा. उच्चस्तरीय समितीसमोर सादर केला होता. सदर प्रस्तावास मा. उच्चस्तरीय समितीने दि. ११.०७.२०२३ रोजी झालेल्या बैठकीमध्ये सहमती दर्शविली आहे. यास्तव ग्रामीण रुग्णालय मुरुड जि.लातूर येथील ५० खाटांच्या श्रेणीवर्धीत उपजिल्हा रुग्णालय इमारत बांधकामाच्या रु. २५४७.३७ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रक व आराखडयास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये, ग्रामीण रुग्णालय मुरुड जि.लातूर येथील ५० खाटांच्या श्रेणीवर्धीत उपजिल्हा रुग्णालय इमारत बांधकामाकरिता रु. २५४७.३७ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास खालील प्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

२. उपरोक्त अंदाजपत्रकाची प्रशासकीय मान्यता खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच, विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

२) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

३) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

४) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजूरी घेणे आवश्यक राहील.

५) सदर कामाची निविदा काढतांना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकत्र एकच निविदा काढण्यात यावी.

६) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्या-त्या भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून करुन घ्यावेत.

७) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिक दृष्टया मान्यता करीता असताना आरोग्य खात्याच्या त्या-त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उप संचालकांच्या सहमतीने तरतूदी अंतिम करण्यात याव्यात.

८) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.तसेच काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पुर्तता करुन घ्यावी.

९) नियोजन विभागाच्या दि.११.०६.२०१८ च्या शासन निर्णयामधील सुत्रानुसार नवीन बाधकाम हाती घेण्यासाठी निधी उपलबध झाल्यानंतर काम हाती घेण्यात येईल.

३. सदर बांधकामांवरील खर्च "लेखाशिर्ष - ४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१ नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय), ११० - रुग्णालये व दवाखाने,(१) (अ)- पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना- इमारती, (००)(०१)- मोठी बांधकामे (४२१० ००१४), ५३ - मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३१८/इमा-२, दि.२०.०६.२०१८ अन्वये दर्शविलेल्या सहमतीनुसार आणि वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र- २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ परिच्छेद क्र.१३४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१३१८२१५३२०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4be f92b6886b147679a5af5a494e268689a b8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34 324CEA1A547AA04F0DA0794A00BEE1 26E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.08.01 16:39:32 +05'30'

**( अशोक मा. आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२. जिल्हाधिकारी, लातूर.
३. संचालक, आरोग्य सेवा-१, संचालनालय, आरोग्य भवन, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा-२, मध्यवर्ती इमारत, पहिला मजला, पुणे-१.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
६. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
७. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
८. उपसंचालक, आरोग्य सेवा (लातूर परिमंडळ), लातूर
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, लातूर
१०. जिल्हा शल्य चिकित्सक, लातूर
११. महालेखापाल,(लेखा व लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
१२. वित्त विभाग (कार्यासन-विनियम), मंत्रालय, मुंबई.
१३. अवर सचिव (आरोग्य-३), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती ( आरोग्य-४ ).